जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर कार्यालयाकरीता "आहरण व संवितरण अधिकारी" घोषित करण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आसंअ २०२२/ प्र. क्र. ०८/आ ३अ**

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : २२ मार्च , २०२२

वाचा :-

१. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदनि २०१४/ प्र. क्र. १७६ (भाग-२) /आरोग्य -३अ, दिनांक ३०.१०.२०१४
२. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण २०१५/ प्र. क्र. ७६ /आरोग्य -३अ, दिनांक २४.०२.२०१५
३. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदनि २०१८/ प्र. क्र. ४० (भाग-२) /आरोग्य -३अ, दिनांक २३.०५.२०१८
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने) , मुंबई यांचे पत्र क्र. आआसे /कक्ष-७अ/टे-६/पालघर/आह व संवि /२३२/२०२२, दिनांक ११.०१.२०२२

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक १) येथील दिनांक ३०.१०.२०१४ च्या शासन निर्णयान्वे, आरोग्य विभाग, जिल्हा परिषद पालघर करीता ५४ पदे मंजूर करण्यात आलेली होती. उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक २) येथील दिनांक २४.०२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांना "आहरण व संवितरण अधिकारी" घोषित करण्यात आलेले होते. तदनंतर उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ३) येथील दिनांक २३.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद पालघर या कार्यालयाकरीता प्रशासकीय अधिकारी हे पद मंजूर करण्यात आलेले होते. आता सहसंचालक, आरोग्य सेवा, (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने) , मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ४) येथील दिनांक ११.०१.२०२२ रोजीच्या पत्रान्वये, जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या कामाची व्याप्ती पाहता, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर कार्यालयाकरीता प्रशासकीय अधिकारी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" घोषित करण्याचा प्रस्ताव सादर केलेला आहे. यासंदर्भात

दिनांक २४.०२.२०१५ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून, पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

" प्रशासकीय अधिकारी, गट-ब" जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर कार्यालय यांना महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्रमांक १५६ मधील तरतूदीनुसार “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१/२०२२ /कोषा.प्रशा-५, दिनांक २४.०१.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२२१२२७२६४७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2022.03.22 15:48:28 +05'30'

( दी. नि. केंद्रे )
अवर सचिव , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल ( लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक (१), आरोग्य सेवा , मुंबई
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे
५. जिल्हा आरोग्य अधिकारी, पालघर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर
७. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (आरोग्य ३अ)